**अस्थायी पदे दि.०१/१०/२०१८ ते**
**दि.२८/०२/२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्था-२०१६/प्र.क्र.५३/ आस्थापना.**
नवीन प्रशासकीय भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- १६ ऑक्टोबर, २०१८.

वाचा-

१) शासन निर्णय पर्यावरण विभाग क्र.आस्था-२००६/प्र.क्र.९०/का.३, दि.२१.६.२००६.
२) शासन निर्णय वित्त विभाग पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.१०.२.२०१६.
३) शासन निर्णय पर्यावरण विभाग आस्था-२०१६/प्र.क्र.५३/ आस्थापना, दि.२३.२.२०१६.
४) शासन निर्णय पर्यावरण विभाग क्र.आस्था-२०१५/प्र.क्र.२५७/आस्थापना, दि.८.६.२०१६.
५) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२१.९.२०१६.
६) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/आ.पु.क., दि. ०३/१०/२०१७.
७) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि. ८/१/२०१८.
८) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.५/३/२०१८.
९) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७/०९/२०१८

प्रस्तावना-

सर्व प्रशासकीय विभागांची सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याची कार्यवाही अद्याप पूर्ण झालेली नसल्यामुळे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.९ येथील दि.०७/०९/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१/१०/२०१८ ते दि. २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने पर्यावरण विभागाच्या आस्थापनेवरील ११ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उच्चस्तरीय सचिव समितीच्या सोमवार, दि.०५.०६.२००६ रोजी झालेल्या ३६ व्या बैठकीत पर्यावरण विभागातील पदांच्या आढाव्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार उपरोक्त अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये, पर्यावरण विभागातील ४८ पदांना शासनाची मंजूरी देण्यात आलेली आहे. विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयानुसार सदर ४८ पदांपैकी ८०% पदांचे (३७ पदे) स्थायी पदात रूपांतर करण्यात आले आहे. स्थायी करण्यात आलेली हि ३७ पदे वगळता सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र १ मधील पर्यावरण विभाग (खुद्द) व तांत्रिक कक्षामधील उर्वरित ११ अस्थायी पदे दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. या पदांवरील खर्च २२५१-सचिवालय सामाजिक सेवा ०९०-सचिवालय (००) (०१) पर्यावरण विभाग (२२५१ ०२६७) ०१-वेतन व भत्ते या अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन २०१७-१८ व सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात येणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/ १६/ आ.पु.क., दि.०७/०९/२०१८, अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२२१६१४२३३५०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Manohar Ramchandra Bandpatte

Digitally signed by Manohar Ramchandra Bandpatte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0cfbfeeede9517aa9b96ad1d49625c9c5ad8e7d6dc787d92279da33b569805fb, serialNumber=bb7b9a28cd6d8e2b1fa8f60d210258464e6ece204d02617fbb7ed6be3db6752c, cn=Manohar Ramchandra Bandpatte
Date: 2018.10.22 16:18:25 +05'30'

**( मनोहर बंदपट्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) प्रधान सचिव (पर्यावरण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा, मुंबई.
५) वित्त विभाग (अर्थ-१९/व्यय १६), मंत्रालय, मुंबई.
६) कक्ष अधिकारी, रोखशाखा
७) निवडनस्ती.

विवरणपत्र-१

शासन निर्णय वित्त विभाग क्र.आस्था-२०१६/प्र.क्र.५३/आस्थापना,

दि. १६ ऑक्टोबर, २०१८ सोबतचे सहपत्र

पर्यावरण विभाग (मंत्रालय खुद्द) च्या आस्थापनेवरील अस्थायी पदे

| अ.क्र. | पदनाम | वेतन संरचना (वेतनबँड+ग्रेड पे) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | उप सचिव | रू.१५,६००-३९,१०० +७६०० | १ |
| २ | शास्त्रज्ञ श्रेणी-१ | रू.१५,६००-३९,१०० +७६०० | १ |
| ३ | शास्त्रज्ञ श्रेणी-२ | रू.१५,६००-३९,१०० +६६०० | १ |
| ४ | उच्च श्रेणी लघुलेखक | रू.९३००-३४,८०० +४४०० | १ |
| ५ | निम्न श्रेणी लघुलेखक | रू.९३००-३४,८०० +४३०० | १ |
| ६ | सहायक कक्ष अधिकारी | रू.९३००-३४,८०० +४३०० | २ |
| ७ | लिपिक-टंकलेखक | रू.५२००-२०,२०० + १९०० | २ |
| ८ | शिपाई | रू.४४४०-७४४० + १३०० | २ |
| | एकूण | | ११ |

Manohar Ramchandra Bandpatte

Digitally signed by Manohar Ramchandra Bandpatte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0cfbfeeede9517aa9b96ad1d49625c9c5ad8e7d6dc787d92279da33b569805fb, serialNumber=bb7b9a28cd6d8e2b1fa8f60d210258464e6ece204d02617fbb7ed6be3db6752c, cn=Manohar Ramchandra Bandpatte
Date: 2018.10.22 16:19:32 +05'30'

( मनोहर बंदपट्टे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.